**वेगवर्धित सिंचन लाभ कार्यक्रमातंर्गत पुणे येथील विशेष पथकसाठी चार अतिरिक्त पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-आढावा (२९२/२००७)/आ.(प्रशि.)**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ०१ ऑगस्ट, २००९.**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक-आढावा-२००७/(२९२/२००७)/आ.(प्रशि.), दि. ८ फेब्रुवारी, २००८.
२) शासन शुध्दीपत्रक क्र. आढावा-२००७/(२९२/२००७)/आ.(प्रशि.), दि. १५ जुलै, २००८.
३) शासन निर्णय क्रमांक-आढावा-२००७/(२९२/२००७)/आ.(प्रशि.), दि. १८ नोव्हेंबर, २००८.

**शासन निर्णय :-**

संदर्भीय क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाच्या **वेगवर्धित सिंचन लाभ योजने** अंतर्गत मिळणाऱ्या केंद्रीय सहाय्यासाठी सादर करावयाच्या प्रकल्प प्रस्तावांची छाननी करणे व इतर अनुषंगिक कामासाठी मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुबई यांच्या नियंत्रणाखाली वेगवधीत सिंचन लाभ कार्यकमांतगत पुणे येथे **विशेष पथक** स्थापन करण्यात आले आहे.

२. सदर पथक मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुबई यांच्या नियंत्रणाखाली ठेवण्यात आले आहे. तथापि वेगवर्धीत सिंचन लाभ, पुणे हा कक्ष जलसंपत्ती कक्ष, कोथरुड, पुणे येथे कार्यरत रहाणार आहे. त्यामुळे कामकाजाच्या सोयीच्या दृष्टीने सदर विशेष पथकाचे प्रशासकीय व आर्थिक नियंत्रण हे कुकडी प्रकल्प मंडळाकडे ठेवण्यात येत आहे.

३. वर नमूद विशेष पथकाच्या कामासाठी व कार्यकारी अभियंता, खुद्द महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या कार्यालयातील व अन्य १३ पदे जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या आस्थापनेमधून अंतर्गत समायोजनाने शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकःसंकीर्ण १०९२/सीआर ८०६/व्यय-६, दि.१५ ऑक्टोबर १९९२ अन्वये जलसंपदा विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार, अंतर्गत फिरवाफिरवीने वर्ग करुन घेण्यास शासनाची सहमती देण्यांत आली आहे. त्याव्यतिरिक्त आता सहाय्यक अभियंता श्रेणी-२/शाखा अभियंता २ पदे, लघुटंकलेखक १ पद व वाहनचालक १ पद वर्गीकरणाने तसेच या पूर्वी मंजूर केलेल्या आरेखक या पदांऐवजी अनुरेखक हे पद या पूरक शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

४. वरीलप्रमाणे जादाची चार पदे उपलब्ध करुन दिल्यामुळे एकूण पदांचा तपशिल सोबत जोडलेल्या सुधारित प्रपत्राप्रमाणे आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२००९०८०११७११४४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( द. ल. थोरात )**
शासनाचे सह सचिव.

प्रत,

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य, (लेखापरिक्षा) मुंबई,
मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुबई.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
अधीक्षक अभियंता व संचालक तथा परिमंडळीय अधिकारी, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे.
अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
अधीक्षक अभियंता, ककडी प्रकल्प मंडळ, पुणे.
अधीक्षक अभियंता, कृष्णा कोयना उपसा सिंचन प्रकल्प मंडळ, सांगली.
उप सचिव (निवसं) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ,
निवड नस्ती धारिका आढावा.

शासन निर्णय क्रमांक-आढावा-२००७/(२९२/२००७)/आ.(प्रशि.)
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक : ०१ ऑगस्ट, २००९ चे सहपत्र

**प्रपत्र - (सुधारित)**

**वेगवर्धित सिंचन लाभ कार्यक्रमांतर्गत पुणे येथे विशेष पथक -आस्थापना तक्ता.**

| अ.क्र | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी | पद वर्ग केलेल्या कार्यालयाचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | कार्यकारी अभियंता | ०१ | १०६५०-१५८५० | खुद्द महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ |
| २ | उप अभियंता | ०२ | ८०००-१३५०० | जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक या कार्यालयातील समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी |
| ३ | सहाय्यक अभियंता श्रेणी-२ | ०४ | ६५००-१०५०० | जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक या आस्थापनेवरील ३ पदे व अधीक्षक अभियंता, माजलगांव प्रकल्प मंडळ, बीड या कार्यालयातील १ पद समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी |
| ४ | सहाय्यक अभियंता श्रेणी-२/ शाखा अभियंता | ०२ | ६५००-१०५०० | पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत जायकवाडी भुजल निःस्सारण विभाग, औरंगाबाद बंद झाल्याने शासनाकडे समर्पित केलेल्या व समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी २ पदे |
| ५ | अनुरेखक | ०१ | ५०००-९००० | पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत जायकवाडी भुजल निःस्सारण विभाग, औरंगाबाद बंद झाल्याने शासनाकडे समर्पित केलेल्या व समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी १ पद. |
| ६ | लघु टंकलेखक | ०१ | ४०००-६००० | पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे अंतर्गत जायकवाडी भुजल निःस्सारण विभाग, औरंगाबाद बंद झाल्याने शासनाकडे समर्पित केलेल्या व समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी १ पद. |
| ७ | वरिष्ठ लिपीक | ०१ | ४०००-६००० | जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ अंतर्गत कोल्हापूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कोल्हापूर या बंद झालेल्या कार्यालयातील समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी १ पद. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | लिपिक - टंकलेखक<br><br>(कनिष्ठ लिपिक) | ०१ | ३०५०-४५९० | जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ अंतर्गत कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर या बंद झालेल्या कार्यालयातील समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी १ पद. |
| ९ | वाहनचालक | ०१ | ३०५०-४५९० | जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या अधीक्षक अभियंता, माजलगांव प्रकल्प मंडळ, बीड या कार्यालयातील १ पद समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी |
| १० | शिपाई | ०३ | २५५०-३२०० | जलसंपदा विभागाच्या आढाव्याअंती अतिरिक्त ठरलेल्या महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ अंतर्गत कोल्हापूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कोल्हापूर या बंद झालेल्या कार्यालयातील समायोजनाने वापरण्यासाठी शिल्लक असलेल्या पदांपैकी ३ पदे. |
| | **एकूण पदे** | **१७** | | |

**(द. ल. थोरात )**
शासनाचे सह सचिव